**राज्य शासनाच्या निवृत्ती वेतन धारकांना बँकेमार्फत निवृत्तीवेतन प्रदान करण्याची सुधारीत योजना.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक संकीर्ण - १०१० / प्र. क्र. ८३ / कोषा प्र - ५
दिनांक : ०४ फेब्रुवारी, २०११.

**संदर्भ:-** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. निवेयो - १००७ / प्र. क्र. १२० / कोषा प्र - ५, दि. १८ ऑगस्ट, २००८.
२) वित्त विभाग, शुध्दीपत्रक क्र. निवेयो-१००७ / प्र. क्र. १२० भाग - १/ कोषा प्र - ५, दि. ०७ डिसेंबर, २०१०.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण १००९ / प्र. क्र. २४/ कोषा प्र - ५, दि. ९ सप्टेंबर, २०१०.

**प्रस्तावना:-** राज्य शासनाच्या निवृत्ती वेतन धारकांना बँकेमार्फत निवृत्ती वेतन प्रदान करण्याची सुधारीत योजना संदर्भाधिन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये अंमलात आणली आहे. सदर शासन निर्णयातील परिशिष्ट 'अ' मध्ये नमुद ३९ बँकांचा समावेश या योजनेत केला आहे. तसेच संदर्भाधिन क्र. २ व ३ च्या शासन निर्णयानुसार दि शिरपूर पिपल्स को ऑप बँक मर्यादित, शिरपूर व इंडियन ओव्हरसीज बँक यांचा समावेश या यादीत केला आहे. या एकूण ४१ बँकांद्वारे राज्य शासनाच्या निवृत्ती वेतन धारकांना निवृत्ती वेतनाचे प्रदान केले जाते. शासनाच्या सुधारीत धोरणानुसार आता कोषागारातुन ईसीएस / एनईएफटी सुविधेचा वापर करुन प्रदाने करणे आवश्यक आहे. तथापी या ४१ बँकांमधील काही बँकांकडे Core Banking ची व्यवस्था नाही. त्यामुळे ईसीएस / एनईएफटी चा वापर करुन Core Banking ची सुविधा नसणाऱ्या बँकांना निवृत्ती वेतनासंदर्भातील प्रदान कोषागारातून पाठविता येणार नाही. याचा विचार करुन निवृत्ती वेतनाचे प्रदान ईसीएस / एनईएफटी सुविधेचा वापर करुन शक्य व्हावे याकरीता शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय:-** दि. ०१/०४/२०११ नंतर निवृत्ती होणाऱ्या सर्व निवृत्ती वेतन धारकांनी उपरोक्त ४१ बँकांपैकी फक्त Core Banking ची सुविधा असणाऱ्या बँकेतच निवृत्ती वेतन खाते उघडण्यात यावे. कोषागारांनी अशा निवृत्ती वेतन धारकांचे प्रदान ईसीएस / एनईएफटी चा वापर करुनच करावे.

दि. ०१/०४/२०११ च्या पूर्वी निवृत्त झालेल्या ज्या निवृत्ती वेतन धारकांची बँक खाती Core Banking सुविधा असणाऱ्या बँकेत आहेत, त्यांच्या निवृत्ती वेतनाचे प्रदान कोषागारांनी ईसीएस / एनईएफटी चा वापर करुन करावे. तथापी, ज्यांची खाती Core Banking सुविधा असणाऱ्या बँकेत

नाहीत, त्यांच्या निवृत्ती वेतनाचे प्रदान दि. ३१/०३/२०११ पर्यंत प्रचलीत पध्दतीनेच करावे. तत्पूर्वी, अशा सेवा निवृत्ती वेतन धारकांनी जलद प्रदानाकरीता Core Banking सुविधा असणाऱ्या बँकेमध्ये नव्याने खाते उघडणे आवश्यक राहील याची सर्व सेवानिवृत्ती वेतन धारकांना त्यांच्या बँकांमार्फत / संघटनांमार्फत तसेच प्रत्येक कोषागार अधिकाऱ्याने स्थानिक जिल्हास्तरीय वर्तमानपत्रात प्रेस नोट प्रसिध्द करुन माहिती करुन द्यावी. तसेच ज्या बँकांमध्ये Core Banking सुविधा उपलब्ध नाही, त्यांनी सदर सुविधा उपलब्ध करुन घ्यावी, अन्यथा दि. ०१/०४/२०११ नंतर निवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांची खाती अशा बँकांमध्ये उघडता येणार नाहीत.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०२०५१६२२०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स. अ. मु. नकवी)
उप सचिव

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे व उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
बहुजन समाज पार्टी, डी - १, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई - १. (पाच प्रती)
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी. डी. ओ. बॅरेक नं. १, योगक्षेमसमोर, वसंतराव भगवान चौक, नरिमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२०. (पाच प्रती)
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्हि. पटेल रोड, मुंबई - ४०० ००४. (पाच प्रती)
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई - ४०० ०१३. (पाच प्रती)
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई - ४०० ०२५. (पाच प्रती)
नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२१. (पाच प्रती)
शिवसेना, शिवसेना भवन, रा. ग. गडकरी चौक, दादर, मुंबई - ४०० ०२८ (पाच प्रती)
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालय प्रमुख,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र, नागपूर
प्रधान महालेखापाल (लेखा परिक्षा) - १, महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा परिक्षा) -२, महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल (वाणिज्यिक लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
सह संचालक, ले. व को. पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
सर्व उपकोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कोषा प्रशा-५ कार्यासन, वित्त विभाग